# ईस्टाप



## चेंडु-फळी विशेषांक

# चौकार !..



ई-साहित्य प्रतिष्ठान

ईस्टाप अंक - १०

संपादक -

सुप्रिया (जोशी) जाधव. पुणे

रेणुका (रेपाळ) खटावकर. पुणे

सुधीर सुरेश मुळीक. मुंबई

नमस्कार, वाचकहो!...



लवकरच क्रिकेट वर्ल्डकपच्या महाकुंभास सुरवात होतेय !..
यंदा आशिया खंडात होणा-या या विश्व चषक स्पर्धेसाठी संपूर्ण
भारत देश सज्ज झालाय, अशावेळी आम्हीं मागे कसे राहू !..
या विषयावरील इंटरनेट वर असणारं साहित्य आपल्यापर्यंत
पोहचवण्याचा ईस्टाप चा हा छोटासा प्रयत्न !..

यंदाचा वर्ल्डकप कुणाचा? हा प्रश्न बाजूलाच ठेवा कारण तो
कोणीही जिंकला तरी शेवटी विजय हा क्रिकेट या खेळाचाच आहे
आणि आपल्या देशात क्रिकेट हा धर्मच समजला जातो म्हणजे
वर्ल्डकप आपलाच समजा.आपण नाहीच जिंकलो तर सगळयांना
“अतिथी देवो भव: ” हा आमचा दुसरा धर्म आहे असे सांगत सुटा !.

आणि सचिनने २०१५ चा वर्ल्डकप खेळावं अस कोणाला नाही वाटतं !..
एक वर्ल्डकप किंवा सचिनची अजून चार वर्ष कोणताही पर्याय निवडणं
कठीण आहे. खरंच कोण जिंकेल सांगण्यासाठी ऑक्टोपस बाब पण
आता जिवंत नाही कदाचित क्रिकेट वर्ल्डकप येतोय हे त्याला ठाऊक
होत म्हणूनच त्याने प्रस्थान केलं असावं!.. त्या महान जिवाला स्वर्गात
स्थान मिळालं म्हणे पण आपल्याला स्वर्गात क्रिकेट खेळला जात नाही
किंवा पाहिला जात नाही अस जरी कळाल तरी आपण स्वर्गाचा त्याग
करू क्रिकेट म्हणजे आपल्या देशाचा आत्माच नव्हे का ?...

क्रिकेट शिवाय जगणे अशक्य आहे आणि त्यात हा तर विश्वचषक म्हणजे आणखी
धम्माल!.. आणि यंदा हरलो तरी कोणाचे कपडे फाडण्याचीही गरज नाही ब-याच जणांना
आधीच पेप्सीने उघडच रंगवून लटकवलंय सगळीकडे कदाचित २००७ ची आठवण म्हणून की
काय ब-याच खेळाडूंनी आधीच खबरदारी घेतलेली दिसतेय!...

असो हे सगळं विनोदापुरतं !... खरं तर प्रत्येक भारतीयाला हेच वाटतंय की यंदा आपणच जिंकावं आणि जिंकणारच ही खात्री आहे आम्हाला!.. हे सांगण्याचं कारण म्हणजे जिंकलोच तर आम्ही आधीच हे भाकीत वर्तवून ठेवलं होतं अस सांगता येईल!...
शेवटी भारतीय संघास खूप खूप शुभेच्छा!... तुम्ही हरूच शकत नाही कारण १०० करोड श्वास तुमच्या काळजाशी जोडलेले आहेत... यंदा कप आणाच! किंवा आलाय फक्त जाऊ देऊ नका!....



येत्या १९ तारखेपासून आपल्या काळजाचे ठोके वाढू लागतील अधून मधून चुकतीलही पण बंद पडणारं नाहीत याची काळजी घ्या हार-जीत बाजूला ठेवून मनसोक्त आनंद लुटा पण हा सगळा थरार अनुभवण्या आधी थोडं हसून घेऊया का?...

चला तर मग बघू आमचे फलंदाज कसे चौकार षटकार ठोकतात आणि गोलंदाज कोणा कोणाची विकेट काढतायत !... आणि हो हसता हसता रन आऊट व्हाल हा तशीच फिल्डिंग लावलीय आम्ही पंच म्हणून आपला अभिप्राय आम्हाला नक्की कळवा ...

- सुधीर मुळीक. ( संपादक )



# क्रिकेट श्लोक ...

म्हणे विश्वकप तो मोठ्या तळीचा..
असे खेळ अकरा खुळ्या मंडळीचा !
जिवा लागला छंद धावा बळीचा..
कसा हा असा खेळ चेंडू फळींचा !!

महेंद्र असे आमचा कर्णधार
सदा बॅटने तो करतो प्रहार !
उडी शॉट त्याचा खुळा तो प्रकार..
उभा स्टंप मागे दिसे थंडगार !!

असे गौतमा आज गंभीर वाट..
विरेंद्र उभा राहता थैथयाट !
युवीने बसावे पठाणास पाट..
सुरेशा कळेना हलेना विराट !!

भजीचा पडेना दुसरा कधीचा..
तिघां स्पीनरांचा निवाडा रडीचा !
प्रवीणा तुम्ही स्वींग मारा दुकीचा..
जहीरा मिळो फायदा डावकीचा !!

सचिन आज सम्राट राजा अबाध..
कुणाचा नसे या विधानात वाद !
किती आज आले किती काल बाद
असा खेळतो तो जसा शंख नाद !!





द्रवीडा कळेना कुणा दोष द्यावा...
अरे सौरवा रोज चॅपल स्मरावा !
घरी चोर मोदी सदाचा पडावा
तुझ्या सोबतीला कलमाडी यावा !!

नका रे करू घात फिक्सींग आता...
अरे पाकड्यांनो कसे शेण खाता !
रडीचा नको खेळ का डाग माथा
बुकींना बुक्या घालता मार लाथा !!

नको रोज पंचा करू पंचनामा..
खुले ठेव डोळे जरा ताट माना !
नको टाळणे तीसरा पंच घ्या ना..
विनाकार आऊट देऊ नका ना !

- सुधीर मुळीक





आता क्रिकेट हा धर्म म्हटलं तर श्लोकही आलेच
आणि क्रिकेटवर आजवर बरेच सिनेमा,मालिका,
आणि बरच साहित्य देखिल लिहिलं गेलं आहे !...
गावस्कर नावाच्या सिनेमाबाबत आपण कधी एकलय ?

काय म्हणताय नाही ऐकलंय ?....
ऐका तर मग ...



ऑस्ट्रेलियात ' गावसकर ' नावाचा चित्रपट निघाल्याचं गावसकर ला समजतं !

तो उत्सुकतेने लगेच ऑस्ट्रेलियाला जातो आणि कसंबसं तिकीट काढून तो चित्रपट बघतो...

आणि दुस-या दिवशी त्या चित्रपटाच्या डायरेक्टरला भेटतो आणि विचारतो.

"तुम्ही या चित्रपटाला माझं नाव दिलय आणि त्यात माझ्या बद्दल काहींच नाही याचा अर्थ काय?"

डायरेक्टर - " आता समजलं कि नाही तुम्हा लोकांना? तुम्ही 'बॉर्डर' चित्रपट काढलात तो त्यात ॲलन बॉर्डर विषयी काही होतं का ?...

हे.. हे.. हे !..



आता ह्या अंकाच घ्या हा अंक आपल्यासोबत भारतीय खेळाडुंना पण पाठवलाय आम्ही !...
कसा ?... अहो ईमेल आयडी आहेत त्यांचे आमच्याकडे

आणि खास तुमच्यासाठी इथेही उपलब्ध करून देत आहोत .. खेळाडुंना आपल्या शुभेच्छा नक्की पाठवा !...



व्ही व्ही एस लक्ष्मण : available@test-only.com

अनिल कुंबळे : only@dlf_ipl.com

सचिन तेंडुलकर : sachin@mastars.com

महोम्मद कैफ़ : good@for_nothing.com

विरेंद्र सहवाग : consistently@ out_of_form.com

राहूल द्रवीड : stick@crease_like_fevicol.com

इरफ़ान पठाण : takewickets@only_with_ kenya.com

ग्रेक चॅपल : only_experiment@noresult.com

मुनाफ़ पटेल : only_line&length@nospeed.com

हरभजन सिंग : no_spinpitch@nowicket.com

सुरेश रैना : why_i_am_there@ god_knows.com

विषेश सुचना :- वरील ईमेल आयडी चुकीचे असल्यास
आम्ही जवाबदार नाही !...





# कसोटीची 'टेस्ट' ...

कसोटीची 'टेस्ट' पहायला
आता कुणी धजलं कसं?
पांढ-या पाढ-या कपड्यांमध्ये
'चिअर्स' साठी सजलं कसं?

ट्वेंटी-२० च्या खेळात
विक्रमांचा इतिहास घडत आहे.
षटकारांची बरसात पाहुन
कसोटी मैदान रडत आहे.

दमदार खेळाडुंचा आवाज
आता कमी होईल
ज्याच्या त्याच्या कानांवर
'युवराज' नावाचा 'ध्वनी' होईल

ट्वेंटी-२० चा खेळ आता
सट्टेबाजार ठरतो आहे.
तीन - तीन दिवस खेळणा-याची
किंमत कोण करतो आहे?



म्हणे वन-डे साठीही एक दिवस
'वेस्ट' कशाला घालवायचा,
तीन तासाचा शो च आता
डे-नाईट चालवायचा.

ट्वेंटी-२० च्या बाळानं
चांगलच बाळसं धरलं आहे
कसोटीचं आयुष्य आता
नावापुरतच उरलं आहे.

कसोटीची 'टेस्ट' आता
पार फिकि पडली आहे
वन-डे नंतर ट्वेटी - २० ने
पुन्हा कंबर मोडली आहे.

- रमेश ठोंबरे



एकदा संता आणि बंता स्टेडिअम मध्ये
क्रिकेट सामना पाहत असतात ...
मध्येच संता ओरडतो "गोल गोल" !...

यावर बंता लगेच त्याचे तोंड दाबून त्याला सांगतो
अरे मुर्खा गोल या खेळात नसतो
तो क्रीकेट मध्ये असतो !...

हे.. हे.. हे..

ट्वेंटी-ट्वेंटी क्रिकेट्च्या यशा नंतर काही विद्यार्थांनी परीक्षेतही यातिल काही बांबीचा विचार व्हावा अस पत्र आपल्या मुख्याध्यापकास लिहीले आणि काही उपयूक्त बदल सुचवले ...



१) परिक्षेचा वेळ आणि मार्क कमी करावेत १ तास ५० मार्क्स..

२) १५ मिनिटाच्या अंतराने ५ मिनिटांचा स्ट्रॅटजीक ब्रेक मिळावा

३) पेपर लिहीत असताना एक free हीट असावी ज्यात विद्यार्थी स्वतःचा प्रश्नावर उत्तर लिहू शकतात!...

४) पहिल्या १५ मिनिटांचा वेळ हा पावरप्ले म्हणून घोषीत व्हावा ज्यात परिक्षकाने वर्गाच्या बाहेर थांबावे!...

५) पेपर सुरू होण्याआधी आणि संपल्यानंतर चियर्स बालांकडून प्रोत्सहनपर नृत्य आयोजन!...

टी ट्वेंटी वर्ल्डकप नंतर धोनी घरी आला
आईने त्याला बशीतून चहा दिला !...

त्यावर धोनीने आईला विचारले
आई आज मला बशीतून चहा का?
आई: कारण कप पाकडे घेऊन गेले !...

हे.. हे.. हे..



## वात्रटीका ...

ओव्हरपासून बॅटपर्यंत
सगळेच आखूड होऊ लागले.
चिअर्स गर्ल्सचे कपडेही
तसाच प्रतिसाद देऊ लागले.

क्रिकेट नुसता खेळच नाही
तो तर 'ललित' कला आहे !
काळ्याचे पांढरे करण्याचा
अगदी सोपा मार्ग झाला आहे !!

वन डे चे बादशहा झाल्याचे
वृत्त आत्ता आत्ता ताजे होते.
आता दु:खाने म्हणावे लागते
ते एका दिवसाचे राजे होते.

त्यानांच राजेपद शोभते
ज्यांच्याकडे सातत्याचा मेळ आहे !
बोलुनचालून क्रिकेट तर
अनिश्चिततेचा खेळ आहे !!

क्रिकेट आणि जुगाराची
जेंव्हा जेंव्हा मिक्सिंग होते.
तेंव्हा तेंव्हा सामन्याची
हमखास फिक्सिंग होते.





सभ्य माणसांचा खेळ मग
असभ्यपणे खेळला जातो !
नेहमीपेक्षा जास्त पैसा
न खेळताही मिळला जातो !!

खेळात मनोरंजन घातले की,
त्याचा बरोबर सेल होतो.
खेळात राजकारण घुसले की,
त्याचा आयपीएल होतो.

राजकीय भेसळ किती असावी?
यालाही ठराविक माप आहे !
आयपीएल घोटाळा साधा नाही
तो तर बोफोर्सचा बाप आहे !!



-सूर्यकांत डॉळसे,पाटोदा (बीड)



## कसोटीची आणिबाणी ...

क्रिकेटच्या या खेळामधल्या कसोटीची आणिबाणी
मूळावरती डाव मांडला,ट्वेंटी-ट्वेंटीची ही कहाणी //धृ//

वनडे वदला ,"मला समजली पैशांची ही भाषा
माझ्या नशिबासवे बोलती, आय.पी.एल.च्या रेषा "
कां कसोटीच्या डोळा तेव्हा, दाटुनी आले पाणी ? //१//



कसोटी वदली खेळत टिक-टिक काळाचा खेळ सारा
"आज निलामी वाटती नोटा, त्याच्या नावाचा नारा "
अन वनडेला त्वरीत कळली कटू अटळ ही वाणी //२//

तिला विचारी वन डे, "कां हे नाते असे जोडावे ?
कां क्रिकेटने फुलण्याआधी फूल असे तोडावे ?"
या प्रश्नाला उत्तर नव्हते, कसोटी केवलवाणी //३//

कां कसोटीने मिटले डोळे दूर दुर जाताना ?
कां वनडे चा श्वास कोंडला गीत क्रिकेटचे गाताना ?
मैदानावरती विरुन गेली एक उदास विराणी //४//



-सावली राजाराम.






## चेंडोबा चेंडोबा ...

चेंडोबा चेंडोबा थकलास का ?
IPL च्या पैशामध्ये लपलास का ?
IPL चे झाड बेधुंदी,
क्रिकेटचा राडा बेबंदी !

कसोटी-वनडे वर रुसलास का ?
असाच एकटा बसलास का ?
आता तरी परतुनी जाशील का ?
चौकार षटकार खाशील का ?

कसोटी बिचारी रडत असेल,
वनडेचा पारा चढत असेल !
असाच बसून पहाशील का ?
मालकांची बोलणी खाशील का ?

म्हातारे सगळे तरूण झाले,
फिटनेस-बिट्नेस करून आले.
त्यांच्याप्रमाणे तुही नाचशील का?
जादू की झप्पी घेशील का?

चेंडोबा,चेंडोबा कुठे रे गेला ?
ठोकता ठोकता गडप झाला !
चिअर्स गर्ल्सला समजून घेशील का?
टॅक्सवाल्यांना तोंड देशील का ?

-सूर्यकांत डोळसे,पाटोदा (बीड)

व्हीलन अजीत अणि त्याचा राऽबर्ट क्रिकेट मॅच पहात असतात
पाकिस्तान ला जिंकायला फक्त १८ रन हवे असतात.

इंम्रान बॅटींग करत असतोतीनच बॉल शिल्लक असतात.
कपिल बॉलिंग करत असतो.



अजीत - राबर्ट, कपिल को बोलके आव के एक खतरनाक
बीमर डालो और इम्रान को आउट करो.
राबर्ट - ओ.के. बॉस ! तो जातो आणि कपिलच्या कानात ते सांगतो.
कपिल मान हलवतो.
कपिल बॉल टाकतो. पण इम्रान सिक्स मारतो

अजीत - राबर्ट, कपिल को बोलके आव के एक खतरनाक यॉर्कर
डालो और इम्रान का काम तमाम करो.
राबर्ट - ओ.के. बॉस ! तो जातो आणि कपिलच्या कानात ते सांगतो.
कपिल मान हलवतो.
कपिल बॉल टाकतो. पण इम्रान सिक्स मारतो.

आता फक्त १ बॉल ६ रन !
राबर्ट - बॉस अब क्या बोलूं कपिल को?

अजित - राबर्ट ! अब इम्रान को बोलो के तेरी माँ और बीबी हमारे कब्जे मे है !!





सांग सांग भोलानाथ...



सांग सांग भोलानाथ... धोनी जिंकेल काय ?
पुन्हा एकदा वर्ल्डकपची ट्रोफ़ी मिळेळ काय !...

भोलानाथ... सगळ्यांचे दमलेत रे पाय
हे लंगडे घोडे यंदातरी धावतील काय !...
भोलानाथ ! भोलानाथ !! सांग सांग भोलानाथ
धोनी जिंकेल काय ?

भोलानाथ ! भोलानाथ !! खरं सांग एकदा
युवीचे ते सहा सिक्स लागतिल का पुन्हां !...
भोलानाथ ! भोलानाथ !! सांग सांग भोलानाथ
धोनी जिंकेल काय ?

भोलानाथ... पहिला आहे बांग्लादेशचा पेपर
गेल्या वेळेसारखा आपला होईल कारे पोपट !...
भोलानाथ ! भोलानाथ !! सांग सांग भोलानाथ
धोनी जिंकेल काय ?

पुन्हा एकदा वर्ल्डकपची ट्रोफ़ी मिळेळ काय !...
सांग सांग भोलानाथ... धोनी जिंकेल काय ?



सुधीर ...

## खेळू या रे क्रिकेट...

खेळू या रे क्रिकेट, गड्यांनो, खेळू या रे क्रिकेट ।
सुरु जाहली सुट्टी आता, खेळू या भरपेट ।। धृ.।।

बॅट बौल हा माझा घेऊ या,
अंगणी आमुच्या स्टंप रोऊ या,
चहू बाजूंनी कुंपण असता, हवे कशाला नेट ?
गड्यांनो, खेळू या रे क्रिकेट ।। १ ।।

धावांचे मी डोंगर रचता,
येईल मज्जा म्याच जिंकता,
कौतुक म्हणुनी देईल कोणी, एक अनोखी भेट ।
गड्यांनो, खेळू या रे क्रिकेट ।। २ ।।



खेळ खेळता जरी भांडलो,
शत्रू होऊनी जरी झुंजलो,
खेळ संपता, घडवुनी आणू, मैत्रीमधला समेट ।
गड्यांनो, खेळू या रे क्रिकेट ।। ३ ।।

कुणी हारणे, कुणी जिंकणे,
रडीखडीचा ना डाव मांडणे,
खेळ खेळू या गंमत म्हणुनी, नका लावू रे बेट ।
गड्यांनो, खेळू या रे क्रिकेट ।। ४ ।।



संघ भावना शिकण्यासाठी,
गुण चांगले टिपण्यासाठी,
हार-जीत ती बाजूस ठेवुनी, प्रयत्न करू या थेट ।
गड्यांनो, खेळू या रे क्रिकेट ।। ५ ।।

- उपेंद्र चिंचोरे.

## माझी सवत ...

नशिबात माझ्या लिहिली का
हिला सवत माझी
त्याचे प्रेम मिळवण्यात
सारखी मारते तीच बाजी



काय सांगू...जळली मेली..
किती कटकट हिची
सारखी लुडबुड असते
आमच्या दोघामध्ये तिची

तिच्या हालचाली टिपण्यास
क्षणाक्षणाला याचे डोळे अधीर
मी म्हटले.. जावू चल फिरण्यास
तर लगेच याचे कान बधीर

ती येताच भेटण्या कधी
याचे हरपू लागतात भान
मित्रांच्या पुढेही तो गातो
मग तिचेच गुणगान



दिवस पूर्ण जातो याचा
तिलाच निरखण्यात
चूक नाही ना झाली माझी
प्रेमाला पारखण्यात

किती हि सहन करायची
मी तिची मौजूदगी
कधी संपेल का हि
माझी अशी नाराजगी

मानले असतील तिचे
जगात दिवाने अनेक
पण माझ्यासाठी तर
माझे सर्वस्व बस्स एक

मला नाही आवडत
त्याचे सारखे तिलाच पाहणे
मला विसरून फक्त
तिच्यात गुंतत राहणे

खूप दिवस त्याने तिचे दर्शन घेतले नव्हते
म्हणून मी ही सुखाचे घांस गिळत होते
आजपासून पुन्हा क्रिकेट मॅच आहे कळताच
समजुतीचे डोस सकाळपासून मिळत होते ..



-नितू ..



पाकिस्तानच्या शतक मारणा-या खेळाडूला सामना
जिंकण्यासाठी शेवटच्या १० ओव्हर्स मध्ये २ रन आणि
५ विकेट शिल्लक असतानाही कोणतं टेन्शन असतं ?.....

मॅन ओफ़ द मॅच घेताना इग्रजी कसं बोलाव ह्याच !....



भारताचे भावी जावई आता लवकरच भारतात
येणार आहेत इकडे तिकडे पाहू नका हो .
आपला 'तो World Cup' हो Sorry Sorry "ते" येत आहेत.
आमच्या कन्येकेला ( India Team ) ला भेटायला येणार
आहेत (त्यांना घर जावई करून घ्यायची जोरात तयारी
चालू आहे...
असो तर आमची कन्यका आतापासूनच "लगान" चे ,
नाही नाही ...हे अस होत Missprint तर 'लग्नाचे उखाणे'
पाठ करते आहे .....

प्रीतीच्या पावसाने झाल पीच ओल म्हणून
नो बॉल शिवाय काढल्या मी फक्त रन्स चार
एकेक थेंब वाईड वाईड बॉलचा जमवून
वर्ल्डकपरावांच्या सोबतीने थाटते मी संसार

सासूबाई आहेत विकेटकीपर
सासरेबुवा आहेत अम्पायर
लाडक्या भाऊजीची आहे गोलंदाजी
वर्ल्डकपरावाचे नाव घेवून
करते ओपेनिंगला फलंदाजी

बॉलरच्या गुगलीला batsmanची फळी
ओवर ओवर वर फुलते स्कोरची कळी
करून त्याचा गजरा धावते पावलोपावली
वर्ल्डकपरावांच्या कुंकवाची मी टिकली

मीडन ची ओवर त्याला स्टंपच तोरण
जणू गुळपोळीमध्ये घातलं विकेटच पुरण
वर्ल्डकपरावांचे नाव घेवून करते संक्रातसण

लॉलीपॉप कॅच वंडरफुल match
स्ट्रेट ड्राईव त्याला रन्स फाईव
पहिली इनिंग नक्की फिक्सिंग
जिंकलेला toss आहे मी खास
वर्ल्डकपरावांना भरवते घास

- कविता मोकाशी.



समजा क्रिकेट वर आधारीत एका सिनेमाचा शेवट सुरू आहे आणि सिनेमाच्या शेवटी हिरो बॅटींग करतोय त्याला जिंकण्यासाठी एका चेंडुत १० धावा हव्यात!...
समजा या चित्रपटाचे हिरो जर आमीर, अक्षय आणि रजनीकांत आहेत तर तो सिन कसा असेल ..

आमीर : आमीर खेळतोय शेवटचा चेंडू जिंकण्यासाठी दहा धावांची गरज गोलंदाजाचा हा आखूड टप्प्याचा चेंडू आमिर ने हूकचा फ़टका मारलाय चेंडू सीमापार प्रेक्षकांमध्ये जावून पडलाय आणि पंचाचा नो बॉलचा ईशारा अशा रितीने आमीरने मोफ़त ७ धावा जमवल्यात या पुढील चेंडू गोलंदाज तयार यंष्टींच्या उजव्या बाजूने धावत आणि पुन्हां एकदा आखूड टप्याचां चेडूं आमिरने हूकचा फ़टका मारलाय चेंडू उचं गेलाय बघुया चेंडू सिमापार जातोय का झेल होतोय क्षेत्ररक्षक चेंडू खाली झेल घेण्यासाठी सज्ज आणी झेल घेतलाय पण त्याचा एक पाय सीमा रेषे बाहेर अशा रीतीने पुन्हां एकदा हा सीस्सर आणि आमीर ने हा सामना जिंकलेला आहे !...

आता ॲक्शन हिरो !...



**अक्षय** : अक्षय तयार आणि हा उजव्या यष्टीबाहेरचा चेंडू थर्ड मॅनच्या दिशेला टोलावला क्षेत्ररक्षक चेंडुमागे धावतोय चेडुं उचलतोय टाकतोय अक्षयच्या तीन धावा पुर्ण क्षेत्ररक्षकाने टाकलेला चेंडू यष्टींना आदळून पुन्हां फ़ाईन लेगच्या दिशेने जातोय पुन्हां क्षेत्ररक्षक चेंडु मागे धावतोय चेडुं उचलतोय चेंडु टाकलाय अक्षयच्या आणखी तीन धावा पुर्ण !...
अरेरे !.. यष्टीरक्षकाने पुन्हा चेडं सोडलाय चेंडु अतिशय वेगाने कव्हर च्या दिशेने जातोय आणि चेंडु सिमारेषे बाहेर !..
धावुन काढलेल्या सहा आणि बाईजचा चौकार मिळून एका चेंडुत १० धावा पुर्ण अशा प्रकारे अक्षयने हा सामना जिंकलेला आहे! ...

**रजनीकांत** : रजनिकांत गॉगल घालून तयार गोलंदाजाचा हा चेडूं फ़ुलटॉस चेंडु प्रचंड ताकतिने रजनीकांतने त्यावर केलेला प्रहार!...
अरे देवा !.. चेंडुचे दोन भाग झालेले आहेत !...
एक भाग मिडओन वरून प्रेक्षकात जाऊन पडलाय तर दुसरा यष्टीरक्षकाच्या डोक्यावरून सीमारेषे बाहेर अशा प्रकारे एकाच चेंडुत एक षटकार आणि एक चौकार एकुण १० धावा पुर्ण !...
आणि हा सामना रजनिकांतने जिंकलेला आहे !!...



# सौरव बाणा ...

ओळखलत का चॅपेल मला, मैदानावर आला कोणी,
कपडे होते पुमाचे(Puma), केसावरती फ़णी.



क्षणभर बसला थोडा खेळला, बोलला वरती पाहून,
नगमाबाई स्वप्नात आली, गेली मंत्र देऊन.

जून्या प्रेयसीसारखी, चार सिनेमात नाचली,
मोकळ्या हाती जाईल कशी, बायकोचा मार खाऊन गेली.

बॅट खचली शान गेली, सगळे बॅनर्स गेले,
प्रसाद म्हणून पापण्यांमध्ये, रणजी साठि ठेवले.

कारभारणीला घेऊन संगे, नेट प्रॅक्टिस करतो आहे,
गेलेला फ़ॉर्म आणतो आहे, ऍड फ़िल्म मिळवतो आहे.

खिशामधून हात बाहेर येताच, हसत हसत उठला,
बोट नको तुमचे, जरा बदला घ्यावासा वाटला.

मोडून पडलाय फ़ॉर्म, पण मोडला नाहि बाणा,
प्रशिक्षकाचा राजीनामा देऊन, पुन: खेळ म्हणा.

- निलेश लोटणकर





## ती आणि वल्डकप ...

वल्डकप जवळ आला की
तीचं हे अस होत ...
खेळाडुंवर प्रेम दाटून येत
आणि नव-याचं हंस होत !...

घरात असुन सुद्धा
असते मैदानात ती वावरत ...
नेहमीची सासु-सुनांची रडगाणी
पाहण्याचा मोह आवरत !...

घरचा जमा-खर्च मांडणारी ती
क्रिकेट स्कोर चं गणित मांडते ...
एरवी चिऊ काउच्या कथा सांगणारी
सचू अन भज्जीची गाथा सांगते !...

थोडासा जरी रागावलो
स्टंप ने मारण्याची धमकी देते ..
नो बॉल असला तीचा जरी
free हीट मात्र स्वत: घेते !...



तेंडल्याची इन्ट्रीं होताच
नव-याला गेट आऊट म्हणते ...
अपील कोणाचीही असो
माझीच विकेट काढते !...

असो वर्ल्ड्कप आला की
माझ्या घरी दिवाळी असते ...
थोडे दिवस का होईना
भांडी घासायची पाळी असते !...

राजा राणीचा संसार आमचा
क्रिकेटच वाटोळं होऊदे
दर चार वर्षांनी येणारा वर्ल्डकप
आता दहा वर्षांनी येऊदे ...



- सुनाक्षी देशमुख ...





## हात नका लावू ...

अहो येता जाता सट्टा का हो लावता,
अन क्रिकेटच्या खेळाला बट्टा का हो लावता.

बॉस आज सुट्टीवरी, त्यात क्रीकेट कॉमेंट्री
चंगळच चंगळ करूनी घ्या हो,
हात नका लावू कुणी कामाला

नवा कोरा टीव्ही लाख मोलाचा,
व्हॉल्युम तुम्ही ठेवा जरा जोराचा, हो जोराचा
नजर नका लावू कुणी, "यूवी-धोनी" जोडीला...
हात नका लावू कुणी कामाला

भीड नका ठेवू आल्या गेल्याची,
मस्त पार्टी करा आलूबोंडयाची,हो बोंडयाची
काय म्हणू बाई बाई, ह्या लोडशेडींगला
हात नका लावू कुणी कामाला.



- प्रा. सुरेश खेडकर.





## सचिन देवा...



नमन तुला हे सचिन देवा
तुझ्या पराक्रमाचा आम्हास हेवा....

कीर्तिवंत तू, रन धुरंदर
क्रिकेट जगताचा दित्य कलंदर..

वंडर बॉय तू, लिटील मास्टर
नमले स्पिनर, नमले फास्टर....

चौकार षटकारांची खेळी अजरामर
स्वप्नातही हतबल, शेन वार्न तो पामर....

कर्मयोगी तू अचल निरंतर
रचीलेस विक्रमांचे अभेद्य डोंगर...

उपरा न तुज कुणी, काळा न गोरा
धर्म, सीमांचा तुज ठायी न थारा..




एक दिलाने जयघोष ते करिती....
परकीयांना जेव्हा धूळ चारीसी..

भारत भूषण तू अलौकिक ठेवा....
नमन तुला हे सचिन देवा...

- संदेश धनु.

# ई-साहित्य प्रतिष्ठान



रसिकांना नेहमी उत्तमोत्तम साहीत्य पुरवण्याच्या ध्यास ई साहित्य प्रतिष्ठान जोमाने पार पाडत आहे या माध्यमातुन आपल्यापर्यंत येणा-या ईस्टाप ह्या विनोदी अंकाच्या आगामी विषयावर आधारित आपले विनोदी साहित्य ( कविता, लेख, विनोद ) आम्हाला पाठवण्यासाठी तसेच हा अंक विनामुल्य मिळवण्यासाठी , आपल्या सुचना, अभिप्राय आणि प्रतिक्रियासांठी मेल करा ...

**esahity@gmail.com**

## ई साहीत्य प्रतिष्ठानची विनामुल्य ई नियतकालिके ...

नेटाक्षरी , ईस्टाप , स्वर नेटाक्षरी , बाल नेटाक्षरी

## प्रसिध्द झालेली ई बुक्स ...

टल्लीची शाळा ...
ग्रेव्हयार्ड लिटरेचर ...
तो आणी ती ...
देशी दारूचे दुकान ...
ई शाळा...
लोकल गोष्टी ...
ओथंब ...
सईची वही... ( काही पानं निखळलेली )

मकरंदच्या त्रीवेण्या ...
चार क्षण ...
प्रियेचे अभंग...
तो मी आणि सिगरेट ...
मोरया ...
मीरा ...
सावळ्या मुलीची गाणी ...



## आमची ई बुक्स विनामुल्य मिळवण्यासाठी

**esahity@gmail.com**

